**अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील गट-ब (राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांसाठी अधिसंख्य पद निर्माण करण्याबाबत - श्रीमती रेखा राजन्ना कुडमुलवार, सांख्यिकी अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. ईएसटी १०२३ / प्र.क्र.७४ / का.१४२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ३/७/२०२४.

**संदर्भ :-** (१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९.

(२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दिनांक ३०/६/२०२०.

(३) अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती किनवट, मुख्यालय औरंगाबाद यांनी प्रकरण क्रमांक NAN/SER/१४८/२००८ संदर्भात दिनांक १८/७/२०२३ रोजी पारीत केलेले आदेश जा. क्र.५५१०/२०२३, दिनांक १९/७/२०२३.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९ अन्वये मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हील अपिल क्र.८९२८/२०१५ (चेअरमन ॲन्ड मॅनेजिंग डायरेक्टर, एफसीआय आणि इतर विरुध्द जगदीश बालाराम बहिरा व इतर) व इतर याचिका यामध्ये दिनांक ६ जूलै, २०१७ रोजी मागास जातींना असलेल्या आरक्षणाच्या आधारे शासकीय सेवेत दाखल झालेल्या व त्यानंतर जातीचे दावे अवैध ठरलेल्या व्यक्तींना शासकीय सेवेत संरक्षण देय ठरत नाही, या निर्णयाची अंमलबजावणी करण्यासाठी आणि मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.३१४०/२०१८ मध्ये दिनांक २८/९/२०१८ च्या आदेशान्वये मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुसार कार्यवाही करण्याचे आदेश दिले असल्याने अशा अधिकारी / कर्मचारी यांची अधिसंख्य पदे निर्माण करुन या अधिसंख्य पदांवर अधिकारी / कर्मचारी यांना वर्ग करण्याची कार्यवाही करण्याची सूचना दिली अहे. त्यानुषंगाने नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई या कार्यालयाच्या आस्थापनेवरील गट-ब (राजपत्रित) संवर्गातील श्रीमती रेखा राजन्ना कुडमुलवार, सांख्यिकी अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे "मन्नेरवारलू" अनुसूचित जमातीचे प्रमाणपत्र व वैधता प्रमाणपत्र अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती किनवट, मुख्यालय औरंगाबाद यांनी संदर्भ क्र. ३ येथील आदेशाद्वारे रद्द केले आहे. त्यामुळे श्रीमती रेखा राजन्ना कुडमुलवार यांच्याकरीता अधिसंख्य पदे निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी २०२०/प्र.क्र.१८७ अे/१६-ब, दिनांक ३०/६/२०२० अन्वये मा. सर्वोच्च न्यायालयाचे सिव्हील अपिल क्र.८९२८/२०१५ व इतर याचिका मध्ये दिनांक ६/७/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाची व मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ नागपूर यांनी रिट याचिका क्र.३१४०/२०१८ मध्ये दिनांक २८/९/२०१८ च्या आदेशाची अंमलबजावणी करण्याकरीता "अधिसंख्य पदे" निर्माण करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान केले आहेत. यासंदर्भात सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दिनांक २१/१२/२०१९ अन्वये प्रशासकीय विभागांनी करावयाच्या कार्यवाहीबाबत सूचना दिल्या आहेत. त्यानुसार नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र आणि वैधता प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या आणि सद्यस्थितीत कार्यरत असणाऱ्या संशोधन अधिकारी, गट-ब (राजपत्रित) संवर्गातील श्रीमती रेखा राजन्ना कुडमुलवार, सांख्यिकी अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचेसाठी त्यांच्या सध्याच्या आस्थापनेवर ०१ (एक) अधिसंख्य पद निर्माण करण्यात येत असून, श्रीमती कुडमुलवार यांच्या सेवा या शासन निर्णयाच्या दिनांकापासून अधिसंख्य पदावर वर्ग करण्यात येत आहेत.

२. श्रीमती रेखा राजन्ना कुडमुलवार, सांख्यिकी अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे ह्या अधिसंख्य पदावर कार्यरत असेपर्यंत त्यांच्या वेतन व भत्त्यांवर होणारा खर्च संबंधित कार्यालयाच्या आहरण व संवितरण अधिकारी यांनी वेतनासंबंधीच्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागवावा.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०७०३१५४९५५८९१६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAKASH BABANRAO GHADGE

Digitally signed by PRAKASH BABANRAO GHADGE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2f90259e87b0960801edc01f52214ff1b58c7e3c653fb93bef856fb92941b9d7, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=77E1EBA3AEC9A0675410DB6FA1A6453877671 89322F02B94733DEF91397C59A0, cn=PRAKASH BABANRAO GHADGE
Date: 2024.07.03 16:01:12 +05'30'

**(प्र. ब. घाडगे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव.
४. महालेखापाल-१, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
५. महालेखापाल-१,(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
६. महालेखापाल-२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर.
७. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर.
८. अपर मुख्य सचिव (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय.
९. सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१६-ब) मंत्रालय, मुंबई.

१०. प्रधान सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई.
११. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
१२. संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१३. सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालय, नवी मुंबई/ नाशिक/पुणे/ छ. संभाजीनगर/अमरावती/नागपूर.
१४. उपायुक्त, विभागीय आयुक्त कार्यालय, नवी मुंबई / नाशिक / पुणे /छ.संभाजीनगर/ अमरावती/नागपूर.
१५. जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार कार्यालय, पुणे.
१६. श्रीमती रेखा राजन्ना कुडमुलवार, सांख्यिकी अधिकारी, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे (अर्थ व सांख्यिकी संचालनालयामार्फत)
१७. निवडनस्ती.